**समग्र शिक्षा या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत शिक्षक शिक्षण या केंद्रपुरस्कृत योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील सर्वसाधारण लेखाशीर्षांतर्गत केंद्र शासनाचा प्रथम हिस्सा व त्यास अनुसरुन राज्य शासनाचा समरूप हिस्सा वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निधिवि-२०१९/प्र.क्र.१०५/प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : - १५ जानेवारी, २०२०

वाचा -

१) मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ ७-५/२०१९-आय एस -१२ (सर्वसाधारण) दिनांक १४ नांव्हेंबर, २०१९
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. निधिवि-२०१९/प्र.क्र.८७/ प्रशिक्षण दिनांक, १४ नोव्हेंबर, २०१९
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. अनुवि ४९१९/(३२/१९)/ अर्थसंकल्प दिनांक, ३० डिसेंबर, २०१९

**प्रस्तावना -**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सर्वसाधारण लेखाशीर्षांतर्गत उपरोक्त संदर्भ क्र. १ व ३ येथील पत्रान्वये आवर्ती खर्चासाठी पहिल्या हप्त्याचा निधी रु.१०५०.५५ लाख वितरीत केला आहे. तत्पूर्वी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेतंर्गत तदर्थ स्वरुपात प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु. ३४१.२८ लाख इतका निधी आवर्ती खर्चासाठी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता, वरीलप्रमाणे प्राप्त केंद्र हिस्सा रु. १०५०.५५ लाख व त्यानुसार ४०% प्रमाणे राज्य हिस्सा रू.७००.३६ लाख असा एकूण रु. १७५०.९१ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) ही योजना केंद्र शासन व राज्य शासन यांच्याव्दारे ६० : ४० या प्रमाणात राबविण्यात येत असून या योजनेतंर्गत सर्वसाधारण लेखाशीर्षाखाली केंद्र शासनाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता आवर्ती खर्चासाठी पहिल्या हप्त्याचा निधी रु. १०५०.५५ लाख वितरित केलेला आहे. त्यास अनूसरुन ४०% प्रमाणे राज्य हिस्सा रू. ७००.३६ लाख असा एकूण रु. १७५०.९१ लाख (रु. सतरा कोटी पन्नास लाख एक्क्याण्णव हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने सन-२०१९-२० या आर्थिक वर्षासाठी वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याकरिता केंद्र हिस्सा रु. १०५०.५५ लाख इतका निधी मागणी क्र.ई-२ (००) (०२) समग्र शिक्षा अभियान (२२०२।६२१) सर्वसाधारण, (केंद्र हिस्सा) या लेखाशीर्षातून व राज्य हिस्सा करिता रु. ७००.३६ लाख इतका निधी मागणी क्र.ई-२, १०६ शिक्षक आणि इतर सेवा (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (२२०२।६१२) (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) सन-२०१९-२० या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, ज्या प्रयोजनासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

तसेच, वित्त विभाग अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९ च्या परिपत्रकामधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११५१२३२५५५५२१ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.01.15 12:14:51 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव ( वित्त विभाग ) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
६. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान चर्नीरोड, मुंबई.
७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
८. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
९. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
१०.संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य पुणे
१०.संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
१२.महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
१४.सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६.वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१७.अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती (प्रशिक्षण)